**सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी/जवान यांच्या विधवा/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी व जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत - शहीद जवान हवलदार राजेंद्र सोमनाथ जगदाळे, जि. सोलापुर.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०१९/ प्र. क्र.४३८/२८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

तारीख: २०/१०/२०२०.

**वाचा**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/(प्र.क्र.६८)/२०१९/२८, दिनांक ०२/०८/२०१९

२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०२५/जगदाळे/सैकवि-१६/३३७९,दिनांक १०/१२/२०२०

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः मासैम-२०१९/ प्र. क्र.४३८/२८, दिनांक २८/०२/२०२०

**प्रस्तावना:-**

युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये, तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत / देशाबाहेरील मोहिमेत धारातीर्थी पडलेल्या राज्यातील सैनिकांच्या वारसांना /अपंगत्व आलेल्या सैनिकांना/तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्कर दलातील सदस्य / त्यांच्या कुटुंबियांना संदर्भाधिन दिनांक ०२/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये आर्थिक मदत देण्यात येते. संदर्भ क्र. ३, दिनांक २८/०२/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये शहीद हवलदार राजेंद्र सोमनाथ जगदाळे यांच्या वारसांना रु.५०,००,०००/-(रु.पन्नास लाख फक्त) इतकी आर्थिक मदत मा. मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात आली आहे. शासनाच्या अनुदानातून उर्वरीत ५०% (रू. पन्नास लाख फक्त) रक्कम अदा करण्यासाठी निधीची अर्थसंकल्पीय तरतूद अपुरी असल्याने अंतरीम व्यवस्था म्हणून उर्वरीत रक्कम रू. ५०.०० लाख (रू. पन्नास लाख फक्त) देखील मा. मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यास सहमती प्राप्त झाली आहे.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त प्रयोजनासाठी अंतरीम व्यवस्थेनुसार मा. मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून उर्वरीत रक्कम रू. ५०.०० लाख (रू. पन्नास लाख फक्त) अदा करण्यास प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरून शहीद हवलदार राजेंद्र सोमनाथ जगदाळे यांच्या वारसांना पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| नाव व पत्ता | मृत्यु दिनांक, मोहिम व ठिकाण | वारसाचे नांव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|
| **नं- १५५७२२९०-एन हवलदार राजेंद्र सोमनाथ जगदाळे<br>मु. पो. देशमुखवाडी, ता.माळशिरस , जि.सोलापुर.** | **३ जानेवारी, २०१९ शुंगेटसर, अरूणाचल प्रदेश, ऑपरेशन रिन्हो** | १) श्रीमती ज्योती राजेंद्र जगदाळे( वीरपत्नी) - रु.३०.००लाख<br>२) श्रीमती ताराबाई सोमनाथ जगदाळे (वीरमाता)- रु.२०.००लाख<br>मु. पो. देशमुखवाडी , ता. माळशिरस, जि. सोलापुर. |
| | **एकूण** | **रुपये ५०.०० /- लाख** |

२. शहीद हवलदार राजेंद्र सोमनाथ जगदाळे यांच्या वारसांना एकूण अनुज्ञेय (रू. १.०० कोटी) रक्कमेपैकी उर्वरीत रु.५०,००,०००/-(रु.पन्नास लाख फक्त) इतकी रक्कम देखील अंतरीम व्यवस्था म्हणून मा. मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, सोलापुर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना द्यावयाची आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

४. मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण,६० - इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम,१०२- सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००) (०४) देशांतर्गत सुरक्षासंबंधी मोहिमेत/ चकमकीत धारातीर्थी पडलेल्या / अपंगत्व प्राप्त झालेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५ २६०८)५० - इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सदर प्रयोजनासाठी वित्तीय तरतूद उपलब्ध झाल्यावर उपरोक्त रू. ५०.०० लाख (रू. पन्नास लाख) रक्कम मा. मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीमध्ये पुनर्भरणा करण्यात येईल.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/(प्र.क्र.६८) /२०१९/२८, दिनांक ०२/०८/२०१९ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२०१५५५५८३६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjeev R Keluskar

Digitally signed by Sanjeev R Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, serialNumber=78be615e7dd51ebb89a43e2d8f1b14979bf8f5ae2c63e3a7fe41c5716996cd4b, cn=Sanjeev R Keluskar
Date: 2020.10.20 15:57:16 +05'30'

**(संजीव केळुसकर)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, सोलापुर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापुर,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, सोलापुर,
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,
१०. श्रीमती ज्योती राजेंद्र जगदाळे ( वीरपत्नी ) मु. पो. देशमुखवाडी , ता.माळशिरस, जि.सोलापुर,
११. श्रीम. ताराबाई सोमनाथ जगदाळे (वीरमाता) मु. पो. देशमुखवाडी , ता.माळशिरस, जि.सोलापुर,
१२. निवडनस्ती (२ प्रती).